पुणे मेट्रो रेल्वे प्रकल्पाच्या पीसीएमसी-निगडी मेट्रो रेल्वे कॉरीडॉर प्रकल्पामधील राज्य शासनाच्या हिश्श्याची दुय्यम कर्जाची रक्कम महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन लि. यांना प्रदान करण्याबाबत (सन २०२४-२५)

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक: एमआरडी-३३२४/प्र.क्र.८६/नवि-७
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २१ मार्च, २०२५.

संदर्भः-

१. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. एमआरडी-३३२२/प्र.क्र.१३९/नवि-७, दि. २५ जुलै, २०२४.
२. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. पीआरडी-३३१९/प्र.क्र.०६/नवि-७, दि. १६ मार्च, २०२४.
३. वित्त विभाग परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि. ०१ एप्रिल, २०२४.
४. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. एमआरडी-३३२४/प्र.क्र.८६/नवि-७, दि. २४/१२/२०२४.

**प्रस्तावना:**

पिंपरी-चिंचवड (पी.सी.एम.सी.) ते निगडी कॉरीडॉर क्र.१ए या रु.९१०.१८ कोटी प्रकल्प पुर्णत्व किंमतीच्या उन्नत मेट्रो मार्गिकेची महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. (महामेट्रो) या एसपीव्ही संस्थेमार्फत अंमलबजावणी करण्यास नगर विकास विभागाच्या दिनांक १६ मार्च, २०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यता आली आहे. पिंपरी-चिंचवड (पी.सी.एम.सी.) ते निगडी कॉरीडॉर क्र.१ए या प्रकल्पाकरिता राज्य शासनाकडून रु.९०.६३ कोटी इतके बिनव्याजी दुय्यम कर्ज उपलब्ध करुन द्यावयाचे आहे. सदर प्रयोजनाकरीता सन २०२४-२५ या वर्षात रु.५०.०० कोटी इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. सदर तरतूदी मधून रक्कम **रु.२५.०० कोटी** पीसीएमसी-निगडी मेट्रो रेल कॉरीडॉर प्रकल्पाकरिता महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन लि. कंपनीस बिनव्याजी दुय्यम कर्ज वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

१. पिंपरी-चिंचवड (पी.सी.एम.सी.) ते निगडी कॉरीडॉर क्र.१ए या प्रकल्पासाठी बिनव्याजी दुय्यम कर्ज म्हणून **सन २०२४-२५** च्या अर्थसंकल्पीय तरतुदींमधून रक्कम **रु.२५,००,००,०००/- (अक्षरी रुपये पंचवीस कोटी फक्त)** महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन लि. यांना प्रदान करण्यास या शासन निर्णयाव्दारे शासन मान्यता देण्यात येत आहे. सदरचे निधी वितरण हे **बिनशर्त** स्वरुपाचे आहे.

२. उपरोक्त रक्कम "मागणी क्र. एफ-७ ६२१७- नगर विकासासाठी कर्जे, ८० सर्वसाधारण, १९०, सार्वजनिक क्षेत्र व इतर उपक्रमांना कर्जे (००) (०८) पुणे मेट्रो रेल्वे प्रकल्पाकरिता राज्य शासनाचे

दुय्यम कर्ज, ५५ कर्ज व आगाऊ रकमा (६२१७०७९७)" या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ मधील मंजूर तरतूदीतून खर्ची घालण्यात यावी.

३. उपरोक्त लेखाशीर्ष उपयोगात आणण्यासाठी नगर विकास विभागाचे कक्ष अधिकारी, नवि-५, यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच सह सचिव न.वि.-५, नगर विकास विभाग मंत्रालय मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी यांनी प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यास मंजुरी प्राप्त रक्कम **रू.२५.०० कोटी** रक्कम अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडून आहरीत करून ती महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन लि. यांच्याकडे वर्ग करावी. याबाबतच्या खर्चमेळाची कार्यवाही नवि- ३१ कार्यासनाने करावी.

४. राज्य शासनाकडून दुय्यम कर्ज सहाय्य म्हणून वितरीत करण्यात येणारी **रु.२५.०० कोटी** रक्कम पीसीएमसी-निगडी मेट्रो कॉरीडॉर प्रकल्पासाठी महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लिमिटेडला विहित केलेल्या खर्चासाठी वितरीत करण्यात येत आहे.

५. राज्य शासनाकडून बिनव्याजी दुय्यम कर्ज सहाय्य म्हणून वितरीत करण्यात येणारी **रु.२५.०० कोटी** रक्कम महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लिमिटेड यांच्याकडून सदर प्रकल्पासाठी बाहय संस्थेमार्फत घेतलेल्या मुख्य कर्जाची परतफेड केल्यानंतर वसूल करण्यात यावी.

६. भविष्यात या कर्जावर व्याज अदा करावयाचे झाल्यास त्याची वसुली महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. यांच्याकडून करण्यात येईल, या अटीवर महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. यांना वितरीत करावयाचे दुय्यम कर्ज **रु.२५.०० कोटी** हे तुर्त बिनव्याजी कर्ज म्हणून वितरीत करण्यात येत आहे.

७. सदर कर्ज सहाय्याची रक्कम भविष्यात काही व्याज द्यावे लागल्यास त्या व्याजासह प्रकल्पाकरीता घेतलेल्या मुख्य कर्जाची परतफेड केल्यानंतर एका हप्त्यात करण्यात यावी.

८. पुणे मेट्रो प्रकल्पाकरिता राज्यशासनाकडून केंद्रीय व राज्यस्तरीय/स्थानिक करापोटी येणाऱ्या खर्चासाठी प्राप्त झालेली रक्कम महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लिमिटेडकडे जमा झाल्याचे प्रमाणपत्र सादर करण्यात यावे.

९. सदर रक्कम वितरीत झाल्यानंतर या रक्कमेतून खर्च केलेल्या रक्कमांचा तपशिल पुणे महानगरपालिका/ राज्य शासन /केंद्र शासन यांना सादर करण्यात यावा.

१०.सदर प्रकल्पासाठी केंद्र शासन/राज्य शासन/पुणे महानगरपालिका/पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांच्या करापोटी येणाऱ्या खर्चासाठी प्राप्त होणाऱ्या रक्कमांसाठी महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लिमिटेड यांनी स्वतंत्र लेखे ठेवावेत.

११.राज्य शासनाकडून दिल्या जाणाऱ्या सदर कर्ज सहाय्यासाठी राज्य शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या कर्जा विषयीच्या इतर संबंधीत अटी व शर्ती लागू राहतील.

१२.पिसीएमसी-निगडी मेट्रो कॉरीडॉर प्रकल्पासाठी प्राप्त होणाऱ्या निधीबाबत राज्य शासनाच्या वतीने आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांनी स्वतंत्र लेखे ठेवावेत व वितरीत झालेल्या निधीचे संनियंत्रण करावे.

१३.सदर कर्ज सहाय्याच्या वितरणाबाबत शादिक-२०१२/प्र.क्र.४९/ऋण व हमी, दिनांक ३०/१२/२०१४ मधील सूचनानुसार महाऋण आज्ञावलीत **जोडपत्र-अ** (सोबत जोडले आहे) नुसार माहिती भरण्याची कार्यवाही करण्यात यावी.

१४.सदर लेखाशिर्षाखाली राज्य शासनाकडून पुणे मेट्रो रेल्वे प्रकल्प टप्पा-१ करीता राज्य शासनाचे दुय्यम कर्ज म्हणून एकूण रू.९४६.२० कोटी रक्कम वितरीत करण्यात आली आहे. त्याबाबतचा तपशील संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयात नमूद आहे.

१५.राज्य शासनाकडून **पिंपरी-चिंचवड(पीसीएमसी)-निगडी मेट्रो रेल कॉरीडॉर** प्रकल्पाकरीता सदर आदेशान्वये वितरीत होणाऱ्या निधीनंतर एकूण वितरीत निधीची परिस्थिती खालील प्रमाणे:-

| **अ.क्र.** | **दिनांक** | **रक्कम (रु.कोटी)** | **निधी वितरीत करणाऱ्या संस्थेचे नाव** | **एकूण वितरीत निधी (रु.कोटी)** |
|---|---|---|---|---|
| १ | २४.१२.२०२४ | २५.०० | राज्य शासन | २५.०० |
| २ | सदरचे वितरण | २५.०० | राज्य शासन | **५०.००** |

१६. सदर निधी वितरण आदेश वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि. ०१ एप्रिल, २०२४ मधील संबंधित सर्व अटींचे तसेच परिपत्रकासोबतच्या परिशिष्ठामधील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची पूर्तता होत आहे.

१७.सदर निधी वितरण आदेश वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.१२ फेब्रुवारी, २०२५ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१८.सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२११५१९२७३६२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=E1FEEA176A1E6A273C574BB6F1A1EDB58BF87424118BCCD6EE07340581733B70, cn=VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2025.03.21 15:20:29 +05'30'

**(विजय चौधरी)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव.
मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
सचिव, शहरी विकास मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली.
आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका, पिंपरी.
व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन लि. पुणे.
महालेखापाल- (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
निवासी अधिदान व लेखा अधिकारी, (लेखा परीक्षा), मुंबई.
सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई ३२ .
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
कक्ष अधिकारी, व्यय-३/अर्थसंकल्प-१६/अर्थसंकल्प-३, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
कक्ष अधिकारी, कार्यासन १४४४, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
सह सचिव, नवि-५, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
कक्ष अधिकारी, नवि-४, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
कक्ष अधिकारी, नवि-३१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
रोख शाखा (३ प्रती),
निवड नस्ती, नवि-७.

**शासन निर्णय क्रमांक: एमआरडी-३३२४/प्र.क्र.८६/नवि-७ दि. २१ मार्च, २०२५ चे सहपत्र**

**जोडपत्र-अ**

**पीसीएमसी-निगडी मेट्रो रेल्वे कॉरीडॉर प्रकल्पामधील राज्य शासनाच्या हिश्श्याची दुय्यम कर्जाची रक्कम रू.२५.०० कोटी महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन लि. यांना प्रदान करण्याबाबत**

| अ.क्र. | विवरण | माहिती |
|---|---|---|
| १. | संस्थेचे नांव | महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि., नागपूर (केंद्र व राज्य शासनाचे संयुक्त एसपीव्ही) मेट्रो हाऊस, २८/२, सी.के.मार्ग, आनंद मार्ग, सिव्हिल लाईन्स, नागपूर-४४० ००१. |
| २. | वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक व दिनांक | शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.१२ फेब्रुवारी, २०२५ |
| ३. | कर्जाची एकूण मंजूर रक्कम | **रु. ९०.६३ कोटी** |
| ४. | मंजूर कर्जापैकी यापूर्वी कर्जाची रक्कम वितरीत करण्यात आली असल्यास वितरीत करण्यात आलेली कर्जाची रक्कम | सन २०२३-२४ :- निरंक<br>सन २०२४-२५: रू.२५.०० कोटी<br>(या निधी वितरणापूर्वी) |
| ५. | मंजूर कर्जापैकी सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेली कर्जाची रक्कम | **रु.२५.०० कोटी** |
| ६. | एकापेक्षा अनेक सहकारी संस्था, व्यक्ती/यांना कर्ज मंजूर करण्यात आले असल्यास त्यांच्या नावासमोर, कर्ज मंजूरी रक्कम नमूद करण्यात यावी | लागू नाही. |
| ७. | एकूण कर्ज परतफेडीचे हप्ते | एका हप्त्यात |
| ८. | कर्ज परतफेडीचे हप्त्याची रक्कम | **रु.२५.०० कोटी** |
| ९. | कर्ज परतफेडीचे हप्त्याच्या कालावधी, जसे वार्षिक/सहामाही/त्रैमासिक इत्यादी | मुख्य कर्जाच्या अनुषंगाने अटी व शर्ती निश्चित झाल्यानंतर सदर प्रकल्पासाठी घेण्यात येणाऱ्या मुख्य कर्जाची परतफेड ज्यासाली पुर्ण होईल त्यानंतरच्या पहिल्या वर्षात दुय्यम कर्ज सहाय्याची परतफेड एका हप्त्यात वसूली होणे अपेक्षित आहे. |
| १०. | कर्ज परतफेडीसाठी सवलतीचा कालावधी (Moratorium Period) | नाही. |
| ११. | कर्ज परतफेडीसाठी हप्त्याच्या निश्चित केलेला कर्ज हप्त्याचा दिनांक | - |

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E1FEEA176A1E6A273C574BB6F1A1EDB58BF87424118BCCD6EE07340581733B70, cn=VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2025.03.21 15:20:51 +05'30'

**[विजय चौधरी]**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

| | | |
|---|---|---|
| १२. | कर्ज परतफेडीच्या पहिल्या हप्त्याचा दिनांक | मुख्य कर्जाच्या अनुषंगाने अटी व शर्ती निश्चित झाल्यानंतर सदर प्रकल्पासाठी घेण्यात येणाऱ्या मुख्य कर्जाची परतफेड ज्यासाली पुर्ण होईल त्यानंतरच्या पहिल्या वर्षात दुय्यम कर्ज सहाय्याची परतफेड एका हप्त्यात. |
| १३. | कर्ज परतफेडीच्या शेवटच्या हप्त्याचा दिनांक | |
| १४. | व्याज दर | सदर कर्जावर व्याज आकारणी बाबत तुर्तास तरतूद नाही. तथापि, भविष्यात व्याज आकारण्याची वेळ आल्यास वित्त विभागाच्या सहमतीने व्याज वसूली व व्याजाचा दर निश्चित करण्यात येईल. |
| १५. | विलंब कालावधीसाठी दंडनीय व्याजदर व इतर आकार | लागू नाही. |
| १६. | व्याजाचा परतफेडीच्या हप्त्याचा कालावधी जसे वार्षिक/त्रैमासिक/सहामाही इत्यादी | अनुक्रमांक १४ प्रमाणे |
| १७. | कर्जाच्या खर्चाकरीता लेखाशिर्ष | मागणी क्र. एफ-७ ६२१७- नगर विकासासाठी कर्जे, ८० सर्वसाधारण, १९०, सार्वजनिक क्षेत्र व इतर उपक्रमांना कर्जे (००) (०८) पुणे मेट्रो रेल्वे प्रकल्पाकरिता राज्य शासनाचे दुय्यम कर्ज, ५५ कर्ज व आगाऊ रकमा (६२१७०७९७) |
| १८. | कर्जाच्या वसूलीचे लेखाशिर्ष | नवीन लेखाशिर्ष घेण्यात येत आहे. |
| १९. | कर्जावरील व्याज/दंडनिय व्याज वसूलीचे लेखाशिर्ष | अनुक्रमांक १४ प्रमाणे |
| २०. | कर्जाशी संबंधित असलेल्या सहकारी संस्था यांचे पदनाम, पत्ता व दूरध्वनी क्रमांक | लागू नाही. |
| २१. | शासकिय कंपनीच्या नोडल ऑफीसचे पदनाम, पत्ता व दूरध्वनी क्रमांक | सह व्यवस्थापक (वित्त), महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि.,मेट्रो हाऊस, २८/२, सी.के.मार्ग, आनंद मार्ग, सिव्हिल लाईन्स, नागपूर-४४० ००१.<br>फोन नं. ०७१२-२५५४२१७<br>Email nmrcl.cafo@gmail.com |
| २२. | डी. डी.ओ.चा नंबर | कक्ष अधिकारी, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.<br>डी. डी.ओ. नंबर- ७१०१००२३०१. |

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E1FEEA176A1E6A273C574BB6F1A1EDB58BF87424118BCCD6EE07340581733B70, cn=VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2025.03.21 15:21:31 +05'30'

**[विजय चौधरी]**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**********